**सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षामध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याकरिता संस्था/शाळांची निवड करण्याबाबत.**
**<u>अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे</u>**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- नानिशा-११२३/प्र.क्र.१७९/का.१२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- २५ जून, २०२४

**वाचा :-**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक शाआशा-२००८/प्र.क्र.८१/कार्या-१३, दिनांक २८.०८.२००९.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक नानिशा-२०१६/प्र.क्र.२८०/कार्या-१२, दिनांक २९.०५.२०१७.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक नानिशा-२०१८/प्र.क्र.२१/कार्या-१२, दिनांक १८.०५.२०१८
४) आदिवासी विकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक नानिशा-२०१८/प्र.क्र.२१/कार्या-१२, दिनांक ०९.०६.२०१८.
५) अपर आयक्त, आदिवासी विकास, ठाणे यांचा क्र.नानिशा-२०२४/प्रक्र १/का.७(७)/२७३९, दि.११.०६.२०२४ चा प्रस्ताव.
६) शासन पत्र क्रमांक नानिशा-११२३/प्र.क्र.१७९/कार्या-१२, दिनांक १४.०६.२०२४ अन्वये निर्गमित सचिवस्तरीय समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**<u>प्रस्तावना:-</u>**

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबतची योजना संदर्भ क्रमांक १ येथील दि. २८.०८.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात राबविण्यात येत आहे. तसेच सदर योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण घेत असलेल्या इतर विद्यार्थ्यांसमवेत योजनेंतर्गत प्रवेशित अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांची शैक्षणिक प्रगती अधिक चांगली होण्याच्या दृष्टीने सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षापासून इयत्ता १ ली व इयत्ता २ री या सुरुवातीच्या टप्प्यामध्ये प्रवेश देण्याबाबत संदर्भ क्रमांक २ येथील दि. २९.५.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजना अंमलबजावणीमध्ये सुसूत्रता आणण्याकरिता शाळेमध्ये उपलब्ध शैक्षणिक व निवासी सोयी सुविधा आणि त्याच्या दर्जानुसार गुणांकन निश्चित करून प्राप्त गुणांकनानुसार शाळांची निवड करणे व शाळांना द्यावयाचे शुल्क निर्धारित करण्याकरिता संदर्भ क्रमांक ३ येथील दि. १८.०५.२०१८ व संदर्भ क्रमांक ४ येथील दि.०९.०६.२०१८ रोजीच्या शासन शुद्धीपत्रकान्वये सुधारित धोरण ठरविण्यात आलेले आहे.

२. उपरोक्त वस्तूस्थिती पाहता नामांकित योजने अंतर्गत चालू शैक्षणिक वर्ष सन २०२४-२५ करिता सदर योजनेअंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या जुन्या शाळांना कायम करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

नामांकित निवासी शाळा योजनेंतर्गत सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षात शाळांची निवड करण्याबाबत दिनांक १४.०६.२०२४ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये झालेल्या चर्चेनुसार अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे यांच्या कार्यक्षेत्रातील सदर योजनेंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांना सन २०२४-२५ करीता कायम ठेवण्याबाबत निर्णय घेण्यात येत आहे. सदर शाळांची यादी खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | प्रकल्प कार्यालयाचे नाव | संस्थेचे नाव | नामांकित शाळेचे नाव व पत्ता |
|---|---|---|---|
| १ | जव्हार | विश्वात्मक जंगली महाराज ट्रस्ट, अंभई | आत्मा मलिक इंग्लिश मेडियम स्कुल, अंभई, ता. वाडा, जि. पालघर |
| २ | | भारती विद्यापीठ इंग्रजी माध्यम स्कुल, विक्रमगड, ता. विक्रमगड, जि. पालघर | भारती इंग्लिश मेडीयम स्कुल, विक्रमगड, ता. विक्रमगड, जि. पालघर |
| ३ | शहापूर | विश्वात्मक जंगली महाराज ट्रस्ट स्थानिक कमिटी, मोहिली, अघई, ता. शहापूर, जि. ठाणे | आत्मा मलिक इंटरनॅशनल स्कुल, सी.बी.एस.ई, अघाई, ता. शहापूर, जि. ठाणे |
| ४ | | विश्वात्मक जंगली महाराज ट्रस्ट स्थानिक कमिटी, मोहिली, अघई, ता. शहापूर, जि. ठाणे | आत्मा मलिक इंटरनॅशनल स्कुल, अघई, ता. शहापूर, जि. ठाणे (एसएससी) |
| ५ | | शेतकरी शिक्षण प्रसारक मंडळ, मुंबई | डी.एस.डी. स्कूल कल्याण, ता. कल्याण, जि. ठाणे |
| ६ | पेण | श्री ज्ञानेश्वर माऊली शिक्षण संस्था, आकुर्ली, सुकापुर, ता. पनवेल, जि. रायगड | सेंट अन्ड्रयुज इंटरनॅशनल स्कुल व ज्युनिअर कॉलेज, आकुर्ली, सुकापुर, ता. पनवेल, जि. रायगड |
| ७ | | कै. बाळाराम धर्मा पाटील एज्यूकेशन सोसायटी | सुषमा पाटील विद्यालय व ज्युनिअर कॉलेज कामोठे, ता. पनवेल, जि. रायगड |
| ८ | | भारत एज्यूकेशन सोसायटी संचलित, कुर्ला | माथेरान व्हॅली इंग्लिश मेडियम स्कूल, कर्जत, जि. रायगड |
| ९ | | लीला एज्यूकेशन सोसायटी, शेलू | नम्रता आचार्य इंग्लिश मेडियम स्कुल, शेलू, ता. कर्जत, जि. रायगड |
| १० | घोडेगांव | लोकसेवा प्रतिष्ठाण, पुणे | नेताजी सुभाषचंद्र बोस बॉईज मिलीटरी स्कुल, फुलगाव, पुणे |
| ११ | | बेलासे एज्यूकेशन व चॅरिटेबल ट्रस्ट, पाचगणी | विझडम हायस्कूल व ज्युनिअर कॉलेज, पाचगणी, ता. महाबळेश्वर, जि. सातारा |
| १२ | | डी. एस. शिक्षण संस्था, पाचगणी, खिगर, ता. महाबळेश्वर, जि. सातारा | ब्ल्युमिंगडेल स्कुल व ज्युनिअर कॉलेज, पाचगणी, ता. महाबळेश्वर, जि. सातारा |
| १३ | | साईकृपा एज्यूकेशन फाऊंडेशन ट्रस्ट, पाचगणी | शालोम प्रायमरी ॲन्ड सेकंडरी स्कूल, पाचगणी, ता. महाबळेश्वर, जि. सातारा |
| १४ | | ओम चैतन्य फाऊंडेशन | श्री. जे. आर गुंजाळ इंग्लिश मेडियम स्कुल, आळेफाटा, ता. जुन्नर, जि. पुणे |
| १५ | | समर्थ ज्ञानपीठ, वाघलवाडी, सोमेश्वरनगर, ता. बारामती, जि. पुणे | सह्याद्री पब्लिक स्कुल, वाघलवाडी, सोमेश्वरनगर, ता. बारामती, जि. पुणे |
| १६ | | माळशेज निकेतन मुंबई | मॉडर्न इंग्लिश स्कूल, वेल्हे, ता. जुन्नर, जि. पुणे |

| | | | |
|---|---|---|---|
| १७ | | नॅशनल ॲकेडमी ट्रस्ट | नॅशनल पब्लिक स्कुल, पाचगणी, ता. महाबळेश्वर, जि. सातारा |
| १८ | | विश्वात्मक जंगली महाराज आश्रम ट्रस्ट, कोकमठाण | गुरुदेव चैतन्यस्वरुप गुरूकुल इंग्लिश मेडियम स्कूल, नेर्ले, ता. वाळवा, जि. सांगली |
| १९ | सोलापूर | श्रीराम ग्रामीण संशोधन व विकास प्रतिष्ठान संचलित | लोकमंगल इंग्लिश मेडियम स्कुल, वडाळा, ता. उत्तर सोलापूर, जि. सोलापूर |
| २० | | डॉ. के. डी. शेंडगे चॅरिटेबल ट्रस्ट | डॉ. के. डी. शेंडगे इंग्लिश मेडियम स्कूल, उमरगा, ता. उमरगा, जि. उस्मानाबाद |
| २१ | | साई बहुउद्देशिय व समाजसेवी संस्था मोहोळ, ता. मोहोळ, जि. सोलापूर | लिटल बर्ड इंग्लिश मेडियम स्कूल मोहोळ, जि. सोलापूर |

** अ.क्र.१० वरील नामांकित शाळेची मान्यता कायम करण्यात येत आहे. परंतु सदर शाळेतील विद्यार्थीनींचे इतर नामांकित शाळेमध्ये समायोजन करण्यात यावे.

२. शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी पात्र नामांकित शाळांना प्रत्येकी ५० विद्यार्थ्यांचे वाटप करण्यात यावे. त्यासाठी विद्यार्थ्यांनी दि.३० जून, २०२४ रोजीपर्यंत प्रकल्प कार्यालयाकडे केलेले अर्ज तसेच शाळेचा विकल्प ग्राह्य धरण्यात यावेत. नामांकित निवासी शाळा योजनेंतर्गत प्रचलित सर्व शासन निर्णय तसेच शासन नियमांचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच सदर तरतुदींचे पालन न करणाऱ्या शाळांची मान्यता रद्द करण्यात येईल.

३. सदर योजनेची अंमलबजावणी संबंधित प्रकल्प अधिकारी करतील. तसेच अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे हे या योजनेचे “पर्यवेक्षकीय अधिकारी” म्हणून व आयुक्त, आदिवासी विकास नाशिक हे “नियंत्रक अधिकारी” म्हणून जबाबदारी पार पाडतील.

४. सदर योजनेसाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

“मागणी क्र. टी-५
२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण-
पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना- जनजाती क्षेत्र उपयोजना-
०२ अनुसूचित जमातीचे कल्याण
७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना-राज्य योजनांतर्गत योजना
(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना
(०२) (२९) अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण देणे.
(२२२५ सी-९९९) ३१ “सहायक अनुदाने (वेतनेतर)”

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या या www.maharashrta.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६२५१२३२१८६२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LALITKUMAR
RANGNATH DHAYGUDE

Digitally signed by LALITKUMAR RANGNATH DHAYGUDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=77ee43feb646b7ae43865425ca1d67a75cd7607faeae62a4e9bad488155d6d28, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=84E88A84C7D5FA8833BA5D3A151CAF394D94599C220A07BDD761A398EED0AC3E, cn=LALITKUMAR RANGNATH DHAYGUDE
Date: 2024.06.25 16:56:29 +05'30'

**( ललितकुमार धायगुडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
४) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
८) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
९) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / ठाणे / नागपूर / अमरावती.
१०) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२) सर्व संबंधित संस्था/शाळा (संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत).
१३) निवड नस्ती (कार्या-१२)